**दिवंगत गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, औ.प्र.संस्था, पनवेल यांच्या घरबांधणी अग्रीमावरील व्याज व मुद्दल क्षमापित करणे तसेच नियमबाहय मुद्दलाची वसुली व्याजासह परत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१११११/प्र.क्र.७३/व्यशि- ४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ एप्रिल, २०२२.

<u>संदर्भ:-</u>१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. एचबीए-१०७६/सीआर-७६५-जीईएन-५, दि.०५.०२.१९८१
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई यांचे क्र.१५/ वि.व्य (१)/ २०१८-१९/घबांअ/व्याजमाफी/प्र.क्र.२८/१०५, दि.१६.०३.२०२० चे पत्र
३. शासनाचे पत्र क्र. संकीर्ण-१११११/प्र.क्र.७३/व्यशि- ४, दि. २२.०६.२०२०
४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.४/ आस्था-४/घावटे/ २०२१/२२, दि.१९.०१.२०२१ चे पत्र
५. शासनाचे पत्र क्र. संकीर्ण-१११११/प्र.क्र.७३/२०/व्यशि- ४, दि. ०१.०३.२०२१
६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई यांचे क्र.१५/ लोकआयुक्त/ घावटे / २०२१/१८६, दि.२५.०६.२०२१ चे पत्र
७. शासनाचे पत्र क्र. संकीर्ण-१११११/प्र.क्र.७३/२०/व्यशि- ४, दि. २६.०७.२०२१
८. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय यांचे क्र. प्राकामु/ लेखा/ २०२१/ का-२ (ड)/४४०६, दि.०४.१०.२०२१ चे पत्र
९. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई यांचे क्र.१५/ लोकआयुक्त/ घावटे / २०२१/३०१, दि.१२.१०.२०२१ चे पत्र
१०. शासनाचे पत्र क्र. संकीर्ण-१११११/प्र.क्र.७३/व्यशि- ४, दि. ३१.१२.२०२१
११. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.१५/ वि.व्य (१)/२०२१-२२/घबांअ/व्याजमाफी/३२, दि.०८.०२.२०२२ चे पत्र

**<u>प्रस्तावना:-</u>**

प्रादेशिक कार्यालय, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण यांचे अधिपत्याखाली औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पनवेल येथे कार्यरत असणाऱ्या श्री. गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, यांचे दि.१७.०२.२००७ रोजी निधन झाले आहे. त्यांना प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयीन आदेश दि.१६.०१.२००६ अन्वये वित्तीय नियमावली १९५९ मधील भाग पहिला उपविभाग-१ मधील नियम क्र-१३४ (३) नुसार आर्थिक वर्ष सन २००५-०६ मध्ये रु.२,३१,०००/- (रु.दोन लक्ष एकतिस हजार) इतके घरबांधणी अग्रीम मंजूर करुन प्रदान करण्यात आलेला आहे.

२. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांचे कार्यालयीन आदेश दि.१६.०१.२००७ अन्वये रु.१७,४९५/- (रु. सतरा हजार चारशे पंच्च्यान्नव फक्त) इतक्या घर बांधणी अग्रिम व्याजाची आकारणी करण्यात आलेली आहे. सदर व्याजाची व मुद्दलाची वसूली होण्यापूर्वीच श्री. घावटे, च.श्रे.कर्मचारी, यांचे दि.१७.०२.२००७ रोजी निधन झाले. त्यानुसार दिवंगत श्री. घावटे यांच्या मृत्युच्या दिनांकास मुद्दलाची रक्कम रु. १४,१७३/- एवढी परतफेड झालेली आहे. श्री. घावटे यांच्या घरबांधणी अग्रिमाची शिल्लक मुद्दल रक्कम रु.२,१६,८२७/- इतकी असून मृत्यु-नि-सेवा उपदानातून समायोजित करावयाची रक्कम रु.८६,८८०/-वजाती केल्यानंतर शिल्लक मुद्दल रु. १,२९,९४७/- इतकी राहते. सदर शिल्लक मुद्दल रकमेतून रु.२५,०००/- वजाती केल्यास रु.१,०४,९४७/- शिल्लक मुद्दल वसुल करणे आवश्यक आहे. सदर रकमेबाबत संदर्भ क्र. १ च्या तरतुदीनुसार कार्यवाही करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ अन्वये शासनास सादर करण्यात आला आहे.

३. त्यानुसार वित्त विभाग शासन निर्णय दि. ५.२.१९८१ अन्वये दिवंगत गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, औ.प्र.संस्था, पनवेल यांना रु. १७,४९५/-(रु सतरा हजार चारशे पंच्च्यान्नव फक्त) इतक्या घर बांधणी अग्रिम व्याजाची आकारणी क्षमापित करणे, तसेच शिल्लक मुद्दल रकमेतून रु.२५,०००/- माफ करणे आणि वारसदारांकडून नियमबाहय रु. १,९१,८२७/- वसुली केलेली रक्कम वित्त विभाग शासन निर्णय दि. ५.२.१९८१ अन्वये रु. १,०४,९४७/- इतकी रक्कम वसुल करणे आवश्यक होती. त्यानुसार सदर घरबांधणी अग्रिम मुद्दलाच्या फरकाची रु.८६,८८०/- इतकी रक्कम दिवंगत गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, औ.प्र.संस्था, पनवेल यांच्या वारसदारांना व्याजासह परत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

१. संदर्भ क्र.४ व ११ अन्वये संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सदरच्या प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय क्र. एचबीए-१०७६/सीआर-७६५-जीईएन-५, दि.०५.०२.१९८१ मधील तरतुदीनुसार श्री. गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, हे दि. १७.०२.२००७ रोजी दिवंगत झाले असल्याने त्यांच्या घर बांधणी अग्रीमावरील रु १७,४९५/-(रु सतरा हजार चारशे पंच्च्यान्नव फक्त ) इतके व्याज क्षमापित करण्यास, तसेच घरबांधणी अग्रिमाच्या शिल्लक मुद्दल रक्कम रु.२,१६,८२७/- मधुन मृत्यु-नि-सेवा उपदानातून समायोजित करावयाची रक्कम रु.८६,८८०/-वजाती केल्यानंतर शिल्लक मुद्दल रु. १,२९,९४७/- यातून रु.२५,०००/- इतकी घरबांधणी अग्रिम रक्कम माफ करण्यास व प्रस्तावनेतील परि. ३ मध्ये परिगणना केल्यानुसार नियमबाहय वसुल केलेली मुद्दलाची रक्कम रु.८६,८८०/- इतकी दिवंगत गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, औ.प्र.संस्था, पनवेल यांच्या वारसदारांना व्याजासह परत करण्याच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. यावरील येणारा खर्च दिवंगत गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, औ.प्र.संस्था, पनवेल यांचे वेतन ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची काढण्यात येत होते त्याच लेखार्शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ.सं.क्र.७६/२०२२/विनियम, दि. १७.०३.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने तसेच वित्त विभाग शासन निर्णय दि. ५.२.१९८१ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०७१०२९०७९७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2022.04.07 10:29:54 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई-५१.
३. प्राचार्य,शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था,पनवेल, जि.रायगड
४. महालेखापाल ( लेखा वअनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र,नागपूर
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
६. लेखा व कोषागार कार्यालय, रायगड
७. दिवंगत गणेश केशव घावटे, च.श्रे.कर्मचारी, यांचे वारसदार यांना (प्राचार्य,शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था,पनवेल, जि.रायगड) यांचे मार्फत
८. निवडनस्ती (व्यशि-४)